# गरीब लाकुडतोड्या आणि कबुतर

मराठी : अश्विनी बर्वे



एकदा एक गरीब लाकुडतोड्या होता.तो आपल्या पत्नीच्या बरोबर एका छोट्या झोपडीत राहत होता.





एक दिवस तो आपली कुऱ्हाड
घेवून जंगलात गेला, त्यामुळे
तो एक मोठे झाड तोडू शकेल.



काहीवेळ काम केल्यानंतर तो थकला आणि त्याला भूक लागली. तो आराम करण्यासाठी बसला, तर झाडावर त्याला काही सुंदर कबुतर दिसले.

लाकुडतोड्या भुकेला होता म्हणून तो बंदुक घेण्यासाठी घरी गेला. म्हणजे संध्याकाळच्या जेवण्यात कबुतर मारून खाऊ शकेल.

पण त्याला एकही कबुतर मारू शकला नाही. ते सगळे उडून गेले.मग एक कबुतर त्याच्या जवळ आले. ते लाकुडतोड्याच्या बंदुकीवर बसले आणि म्हणाले की, ”जर तू परत कधीच कबुतरांना मारणार नाही असे वचन दिले तर तू ज्या ज्या वस्तूची इच्छा करशील त्या सगळ्या तुला मिळतील. मग तू शांततेत आणि मजेत जीवन जगशील.”

गरीब लाकुडतोड्या आधी तर हे ऐकून खूप बैचैन झाला पण त्याने वचन दिले.

लाकुडतोड्याने एक मस्त घर आणि खूप साऱ्या पैशांची इच्छा व्यक्त केली.



जेव्हा तो त्याच्या पहिल्या छोट्या झोपडीच्या जागी आला, तेव्हा त्याने तिथे एक सुंदर घर पाहिले.
त्याच्या पत्नीच्या चेहऱ्यावर हास्य होते आणि ती त्याच्या स्वागतासाठी दरवाज्यात उभी होती.



काही काळ तो मजेत राहिला.आता लाकुडतोड्याला चिंता करण्याची काही गरज नव्हती. पण काही दिवसानंतर लाकुडतोड्या असमाधानी झाला.

आता त्याला एक मोठा महाल, सुंदर कपडे आणि घोडा पाहिजे होता. मग तो जंगलात पळत गेला. त्याने कबुतराला बोलावले आणि आपली इच्छा सांगितली.



तो जेव्हा घरी आला , तेव्हा त्याच्या
घराच्या जागी एक अद्भुत महाल उभा होता.
त्याची बायको सुंदर कपडे घालून, त्याचे
स्वागत करण्यासाठी खिडकीत उभी होती.







काही काळ तो खूप खुशीत होता.
आता तो श्रीमंत आणि शक्तिशाली होता.

शेजारचे शेतकरी त्याच्याशी सन्मानाने आणि आदराने बोलत असत.पण लवकरच तो परत असमाधानी झाला.

तो परत जंगलात गेला. त्याने कबुतराला बोलावले आणि त्याला राजा बनविण्यास सांगितले.





राजा झाल्यानंतर त्याला स्वतःला अधिकच शक्तिशाली आहोत असे वाटायला लागले.
त्याने शेतकऱ्यांना त्यांच्या  जमिनीवर भलामोठा  कर भरण्यास भाग पाडले.  शेतकरी राजाला खूप घाबरत होते त्यामुळे ते कर भरत. अशा प्रकारे हळू हळू कर गोळा करत लाकुडतोड्या खूप श्रीमंत झाला.तरीपण तो समाधानी नव्हता. तो खरं तर एक राजा होता, पण त्याच्याशिवायही आजूबाजूला दुसरेही शासनकर्ते होते. आता लाकुडतोड्याला सगळ्या राजांचा राजा बनायचे होते.

त्याने आपल्या शेतकऱ्यांमधील सगळयात मजबूत आणि ताकदीचे लोक निवडले आणि त्याचे  सैन्य उभारले.

मग त्याने आपल्या सैन्याला बरोबर घेवून एका शेजारच्या राजाच्या महालाला घेराव घातला. ज्याच्यावर त्याला विजय मिळवण्याचा त्याने निश्चय केला होता. पण लाकुडतोड्याच्या सैन्याला गोळ्या आणि बाणांचा वर्षाव झेलावा लागला.लाकुडतोड्याच्या सैन्याने कधी लढाई केली नव्हती. त्यांना युद्धाचा काहीच अनुभव नव्हता.त्यामुळे त्यांनी आपले हत्यार खाली फेकून दिले आणि आपल्या शेतामध्ये परत पळून आले.





राजाला खूप राग आला, तो आपल्या महालाच्या बुरुजावर चढला आणि त्याने तिथे कबुतराला बोलावले आणि सांगितले, “मला एक शक्तिशाली सशस्त्र आणि महान सैन्य दे की त्यामुळे मी बाकी सगळ्या राजांच्या राज्यांवर राज्य करू शकेल.तेव्हाच मी संतुष्ट होईल.”

“नाही” कबुतर म्हणाले, “मी तुला शांतीने आणि आनंदात राहण्यासाठी लागणाऱ्या सगळ्या गरजेच्या वस्तू दिल्या होत्या.आता तू जे मागत आहे ते तुला कधीच मिळणार नाही.”

एवढे म्हणून कबुतर वर उडून गेले आणि महालाच्या छतावर जाऊन बसले.



राजा रागाने वेडा झाला. त्याने आपल्या सैनिकांना कबुतरावर तोफ चालवण्याचा आदेश दिला.

तोफेचे गोळे वारंवार महालाला छेदत होते पण कबुतर त्यांच्यापासून वाचत होता.

शेवटी तोफयांच्या गोळ्यांमुळे महाल जळून गेला आणि त्याबरोबर लाकुडतोड्याचे सारे धनपण नष्ट झाले.

तो परत एक गरीब लाकुडतोड्या झाला. जिथे कधी महाल होता, तिथे आता केवळ एक झोपडी राहिली.

रोज लाकुडतोड्या त्या जंगलात जात होता जिथे कबुतर राहत होते.

लाकुडतोड्या झाडे कापून आपल्या पत्नीसाठी काही खाण्यासाठी खरेदी करू शकेल एवढेच पैसे तो कमवत होता.एवढ्यावरच त्याला संतुष्ट रहावे  लागत होते.

**समाप्त**



